**समग्र शिक्षा या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत शिक्षक शिक्षण या केंद्रपुरस्कृत योजनेंसाठी सन २०१९-२० या आर्थिक वर्षातील अनुसूचित जमाती (TSP) उपयोजना लेखाशीर्षांतर्गत केंद्र शासनाचा प्रथम हिस्सा व त्यास अनुसरुन राज्य शासनाचा समरूप हिस्सा वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः निधिवि-२०१९/प्र.क्र.८८/प्रशिक्षण**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,

मुंबई ४०० ०३२.

दिनांक : - २८ नोव्हेंबर, २०१९

**वाचा -**

१) मानव संसाधन विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.एफ ७.२/२०१८-आय एस -१२ (सर्वसाधारण) दिनांक ३० एप्रिल, २०१९

**प्रस्तावना -**

सन २०१९-२० या आर्थिक वर्षात केंद्र शासनाने शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत सर्वसाधारण लेखाशीर्षातंर्गत दिनांक ३० एप्रिल, २०१९ च्या पत्रान्वये पहिल्या हप्त्याचा निधी रु.५३.६८ लाख वितरीत केला आहे. त्यानुसार ४०% प्रमाणे राज्य हिस्सा रू.३५.७८ लाख असा एकूण ८९.४६ लाख इतका निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्र पुरस्कृत योजने अंतर्गत अनुसूचित जमाती उपयोजना लेखाशीर्षाखाली केंद्र शासनाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षाकरिता पहिल्या हप्त्याचा निधी रु.५३.६८ लाख वितरित केलेला आहे. त्यासअनूसरुन ४०% प्रमाणे राज्य हिस्सा रू.३५.७८ लाख असा एकूण ८९.४६ लाख (रु. एकोण नव्वद लाख सेहचाळीस हजार फक्त ) इतका निधी वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

केंद्र शासनाने सन-२०१९-२० या आर्थिक वर्षासाठी वितरीत केलेल्या पहिल्या हप्त्याकरिता केंद्र हिस्सा रु.५३.६८ लाख इतका निधी मागणी क्र.टी-५ (०१) (१०) समग्र शिक्षा अभियान (२२०२।६४८) अनुसूचित जमाती उपयोजना (केंद्र हिस्सा ) या लेखाशीर्षातून व राज्य हिस्सा करिता रु. ३५.७८ लाख इतका निधी मागणी क्र.-टी-५, (०१) (११) समग्र शिक्षा अभियान (२२०२।६५७) (अनुसूचित जमाती उपयोजना) (राज्य हिस्सा ४० टक्के) सन-२०१९-२० या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून खर्च करण्यात यावा.

सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे यांना नियंत्रण अधिकारी व संचालक, विद्या प्राधिकरण, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच, ज्या उद्दिष्टासाठी सदर निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच उद्दिष्टासाठी खर्च करण्यात यावा.

तसेच, वित्त विभाग अर्थसं-२०१९/प्र.क्र.९२/अर्थ-३, दि.०८ जुलै, २०१९ च्या परिपत्रकामधील व केंद्र शासनाच्या संदर्भाधीन दिनांक ३० एप्रिल, २०१९ मधील अटी व शर्तींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९११२८१५००३७००२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2019.11.28 15:03:17 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री, शालेय शिक्षण यांचे खाजगी सचिव
२. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३. अपर मुख्य सचिव (नियोजन विभाग) यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
४. सचिव आदिवासी विकास विभाग यांचे स्वीय सहायक मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
६. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक)महाराष्ट्र राज्य, पुणे
७. संचालक, विद्या प्राधिकरण, पुणे
८. संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य पुणे
९. संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
११.महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/नागपूर.
१३.सर्व प्राचार्य, जिल्हा शैक्षणिक व्यवसाय सातत्यपूर्ण विकास संस्था (DIECPD)
१४.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५.वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१६.अवर सचिव (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१७.निवडनस्ती (प्रशिक्षण)